कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेमध्ये अंशत: बदल.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश, क्रमांकः एलटीएस ११२२/प्र.क्र. २९४/ २०२२/आ (वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : २१ जुलै, २०२३.

**संदर्भ :-** १) शासन आदेश, जलसंपदा विभाग, क्रमांक- बैठक २०२२/प्र.क्र. २४०/द-१, दिनांक २८.०६.२०२३.

**शासन आदेश :-**

जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील श्री.सुर्यकांत मारुती नलवडे यांचे निलंबन दिनांक २८.०६.२०२३ च्या संदर्भाधीन आदेशान्वये संपुष्टात आणून, उप अधीक्षक अभियंता, दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस या कार्यालयातील अकार्यकारी पदावर त्यांची शासन सेवेत पुन:स्थापना करण्यात आली आहे. आता, प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने श्री.नलवडे यांच्या पदस्थापनेमध्ये अंशत: बदल करुन पुढे दर्शविल्यानुसार सुधारित पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | दिनांक २८.०६.२०२३ च्या आदेशान्वये पदस्थापनेचे पद | सुधारित पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ |
| १. | श्री.सुर्यकांत मारुती नलवडे | उप अधीक्षक अभियंता, दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस, जि.सिंधुदुर्ग | कार्यकारी अभियंता, धाराशिव (त.उस्मानाबाद) पाटबंधारे विभाग क्र.२, उमरगा |

२. श्री.नलवडे यांच्या निलंबनाच्या अनुषंगाने दिनांक २८.०६.२०२३ च्या संदर्भाधीन आदेशातील नमूद अटी जशाच्या तशा लागू राहतील.

३. श्री.नलवडे, कार्यकारी अभियंता यांना कळविण्यात येते की, सदर नियुक्ती/ पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे व कोणत्या दिनांकास रुजू झाले याबाबत शासनास doesttclass१.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित कळवावे.

४. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील

नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२३०७२११७०६३६१५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. तसेच सदर आदेश जलसंपदा विभागाच्या www.wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAKHI SACHIN CHAVAN

Digitally signed by RAKHI SACHIN CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=7206b9312f3f73ff523e7a493d6d53d819f5c15336ff9a16ada11a287b879985, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=75AA5A95E2FE606BB64628D64D984EA9D651466BF93A6A2C44EEC93DF9207974, cn=RAKHI SACHIN CHAVAN
Date: 2023.07.21 17:07:28 +05'30'

**( राखी चव्हाण )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री (जलसंपदा) महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव (लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
६) सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
७) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
८) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
९) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१०) अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई.
११) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१२) अवर सचिव (दक्षता), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) संबंधित अधिकारी.
१४) सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१५) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.